**सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून ग्रामपंचायत ग्रंथालयांना सहाय्यक अनुदान (अनिवार्य) वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - मराग्रं-२५२७/प्र.क्र.८८/२०१७/साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० जून, २०१७.

वाचा : १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ ३,दिनांक १८.०४.२०१७.
२) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.३२/२०१७-१८/३३८५-८६, दिनांक १४.०६.२०१७.

**प्रस्तावना :**

राज्यातील एकूण १५४ शासनमान्य ग्रामपंचायत ग्रंथालयांना सन २०१७-१८ करिता रुपये २०९८८ हजार ( रुपये दोन कोटी नऊ लाख अठ्याऐंशी हजार फ़क्त ) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र. १ नुसार अर्थसंकल्पीत निधी खर्च करण्याची मर्यादा ८०% एवढी विहित करण्यात आलेली आहे. शासनमान्य ग्रामपंचायत ग्रंथालयांच्या परिरक्षण अनुदानासाठी दर्जा / वर्गनिहाय एकूण रुपये १९६१४ हजार ( रुपये एक कोटी शहान्नव लाख चौदा हजार फ़क्त ) इतके अनुदान देय असल्याचे संदर्भाधीन क्र. २ च्या पत्रान्वये ग्रंथालय संचालनालयाने कळविले आहे. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ यांच्या कलम १०० अन्वये जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने ( ग्रामपंचायत ग्रंथालयांना सहाय्यक अनुदाने ) (२२०५ ११९६), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशीर्षातर्गत अर्थसंकल्पित निधीच्या ८०% मर्यादेत रु. १६७९०हजार ( रुपये एक कोटी सदुसष्ट लाख नव्वद हजार फ़क्त ) इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील एकूण १५४ शासनमान्य ग्रामपंचायत ग्रंथालयांना सन २०१७-१८ करिता रुपये २०९८८ हजार ( रुपये दोन कोटी नऊ लाख अठ्याएंशी हजार फ़क्त ) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या परिपत्रक क्र अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ ३,दिनांक १८.०४.२०१७ नुसार अर्थसंकल्पीत निधी खर्च करण्याची मर्यादा ८० % विहित करण्यात आलेली आहे. त्यानुसार सहाय्यक अनुदानासाठी अर्थसंकल्पीत मंजूर तरतूदीपैकी ८० % म्हणजे रुपये २०९८८ हजार ( रुपये दोन कोटी नऊ लाख अठ्याएंशी हजार फ़क्त ) पैकी रु. १६७९०हजार ( रुपये एक कोटी सदुसष्ट लाख नव्वद हजार फ़क्त ) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयास वितरीत व खर्च करण्यास ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. हा निधी मागणी क्रमांक डब्ल्यू-४, २२०५- कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०४) स्थानिक क्षेत्राखालील योजना, (०४) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने ( ग्रामपंचायत ग्रंथालयांना

सहाय्यक अनुदाने ) (२२०५ ११९६) (अनिवार्य) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या परिरक्षण अनुदानासाठीचा खर्च चालू वर्ष २०१७-१८ मध्ये अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी वितरीत केलेल्या रुपये १६७९० हजार ( रुपये एक कोटी सदुसष्ट लाख नव्वद हजार फ़क्त ) या निधीतून भागविण्यात यावा.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १८/०४/२०१७ च्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदरचा खर्च करण्यासाठी संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालयाच्या कार्यालय प्रमुखांना आहंरण व संवितरण अधिकारी व ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच ग्रामपंचायत ग्रंथालयांना ECS/ DBT/ NEFT द्वारे ग्रामपंचायत खात्यामध्ये अनुदान जमा करण्यात यावे. अनुदानाच्या रक्कमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधित कार्यालय प्रमुखांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०६३०१५३५२५६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

P. M Takate

Digitally signed by P. M Takate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cbc81d3569a4d80b2e2d776cce4c4a214d2dfe787783854814b3a4fa7c83b18b, cn=P. M Takate
Date: 2017.06.30 15:51:29 +05'30'

( पा. म. ताकटे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल -२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
६. प्रधान सचिव(उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक
७. कक्ष अधिकारी (साशि १), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय
८. निवडनस्ती (साशि-५).